**राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम**
केंद्र हिश्श्यांतर्गत अनुसूचित जाती उपयोजना या घटकासाठी कव्हरेज व गुणवत्तबाधित / देखभाल दुरुस्ती/शाश्वतता या अंतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी अनुदाने **(लेखाशिर्ष २२१५ ९८४४)**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** राग्रापे २०१५/प्र.क्र.६२/पापु-१०
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ३० सप्टेंबर, २०१५

**शासन निर्णय -**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून अनुसूचित जाती उपयोजना या अंतर्गत प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या अनुदाना संदर्भात आर्थिक वर्ष २०१५-१६ मध्ये मागणी क्र. वाय- ०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ७८९, अनुसूचित जातींकरीता विशेष घटक योजना, ०१ अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत योजना, (०१) (०१) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (अनुसूचित जाती उपयोजना) (केंद्र हिस्सा), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९८४४) या लेखाशिर्षाखाली अंमलबजावणी यंत्रणांना कव्हरेज व गुणवत्ताबाधित / देखभाल दुरुस्ती/शाश्वतता या अंतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी अनुदाने मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. आर्थिक वर्ष २०१५-१६ मध्ये ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांकरीता उपरोक्त घटकांसाठी लेखाशिर्ष २२१५ ९८४४ या खाली रु. ४०.८३४७ कोटी (रुपये चाळीस कोटी, त्र्याऐंशी लक्ष व सत्तेचाळीस हजार मात्र ) एवढा निधी महाराष्ट्र जीवन प्राधीकरण आणि भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे यांना सोबत जोडलेल्या विवरणपत्र "अ" अनुसार अर्थसंकल्प प्रणालीद्वारे (BEAMS) पुढील अटींवर मंजूर व मुक्त करण्यात येत आहे. यापैकी रु. ३०.६२६१ कोटी एवढी रक्कम "कव्हरेज व गुणवत्ताबाधित" या घटकासाठी व रु. ६.१२५२ कोटी एवढी रक्कम "देखभाल व दुरुस्ती" या घटकासाठी अशी एकूण रु. ३६.७५१३ कोटी एवढी रक्कम महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना व रू. ४.०८३४ कोटी एवढी रक्कम "शाश्वतता" या घटकासाठी भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे यांना पुढील अटींवर मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

**अटी :-**

अ) संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी हे अनुदान सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात केवळ अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत केंद्र शासनाने दिलेल्या सूचनेनुसार ग्रामीण भागातील अनुसूचित जातींचे प्राबल्य असलेल्या (Rural Habitations having majority of / Dominated by SC Population ) भागांमधील नळ पाणी पुरवठा योजनां संदर्भात कव्हरेज व गुणवत्ताबाधित / देखभाल

दुरुस्ती / शाश्वतता या घटकांसाठी केंद्र शासनाने व राज्य शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार खर्च करावयाचे आहे.

ब) संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

क) वरील अटी/शर्तींची संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून पूर्तता होत आहे ह्याची शासनाला खात्री करुन घेता यावी म्हणून महालेखापाल, महाराष्ट्र- १/२, मुंबई / नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिका-यास लेखा परिक्षणाकरीता संबंधित अंमलबजावणी यंत्रणांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील, महालेखापाल यांना त्यांचे काम योग्य त-हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित अंमलबजावणी यंत्रणा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

ड) शासन परिपत्रक ग्राम विकास विभाग क्र.आरसीएन-१०८९/सीआर-३०२७/२८, दि.५.९.१९९० मधील सूचनेप्रमाणे या अनुदानांच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकाना संबंधित अंमलबजावणी यंत्रणानी या विभागातील कार्यासन क्र. पापु-०५ व पापु- २० ला सादर करावे.

इ) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कव्हरेज व गुणवत्ताबाधीत आणि देखभाल व दुरूस्ती या घटकाखाली हाती घेतलेल्या योजनांसाठीचा खर्च हा ५०% केंद्र निधीतून व ५०% राज्य निधीतून करणे आवश्यक आहे.

फ) सदर निधी सन २०१२-१३, २०१३-१४ , २०१४-१५ वर्षाच्या कृती आराखडयात समाविष्ट असलेल्या गावांच्या योजनांसाठीच खर्च करावा. तसेच उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी उपयोगात आणण्यासाठी कालबध्द कार्यक्रम आखून खर्चाचे नियोजन करावे व उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास वेळीच सादर करावीत.

३. सदर निधीतून करण्यात आलेल्या खर्चाची नोंद केंद्र शासनाच्या IMIS या प्रणालीवर घेण्यात येवून ती वेळोवेळी अद्ययावत करण्यात यावी. तसेच BDS प्रणालीवर मुक्त केलेली रक्कम संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी त्वरित संबंधित कोषागारातून काढण्याची कार्यवाही करावी. कोषागारातून रक्कम वेळीच न काढली गेल्यास तसेच सदर रक्कम या शासन निर्णयात नमूद केलेल्या प्रयोजनांसाठी व केंद्र व राज्य शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार न वापरण्यात आल्यास त्याबाबतची संपूर्ण जबाबदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणांची राहील.

४. यावर होणारा खर्च मागणी क्र. वाय- ०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ७८९, अनुसूचित जातींकरीता विशेष घटक योजना, ०१ अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत योजना, (०१) (०१) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (अनुसूचित जाती उपयोजना) (केंद्र हिस्सा), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९८४४) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१५-१६ साठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी रु. ३६.७५१३ कोटी (रुपये छत्तीस कोटी, पंच्याहत्तर लक्ष व तेरा हजार मात्र) बाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक, (वित्त) ( श्री. सुधाकर डांगे) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (श्री. शां.सि.कुदळे) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. संचालक, (वित्त)( श्री. सुधाकर डांगे) यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे तसेच उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (श्री. शां.सि.कुदळे) यांना

नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरहू रक्कम एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांच्या खाती जमा करण्यात यावी.

६. सदर प्रकरणी वित्त विभाग परिपत्रक दि. १७/०४/२०१५ मधील अनुक्रमांक ७ ते १८ येथील अटींची तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील क्र. ३ व ९ येथील बाबींची पूर्तता होत आहे.तसेच या आदेशान्वये मंजूर व मुक्त केलेली रू. ४०.८३४७ कोटी एवढी केंद्र हिश्याची रक्कम महाराष्ट्र राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याची खात्री वित्त विभाग/अर्थोपाय शाखा यांच्याकडून करण्यात आली आहे.

**७. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक दि. १७/०४/२०१५ व दि. ३०/०६/२०१५ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग , मंत्रालय, मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २४१/विघयो, दि. ११/ ९ /२०१५ अनुसार त्या विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.**

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्रमांक २०१५०९२९१३१३४९१८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Dattatray Salve

Digitally signed by Ashok Dattatray Salve
DN: CN = Ashok Dattatray Salve, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.09.30 12:11:37 +05'30'

(अ.द. साळवे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल, महाराष्ट्र- १ मुंबई (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
२) महालेखापाल, महाराष्ट्र -२ नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
३) उपसचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग ( विघयो ) / वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
७) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई, बेलापूर
८) संचालक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे.
९) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
१०) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पा.पु.०४/ पापु-०५ / पापु-१५/ पा.पु.२० / पा.पु.२३
११) निवडनस्ती कार्यासन पापु १०.

# विवरणपत्र "अ"

<table>
<tr><td colspan="4">शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. राग्रापे २०१५/प्र.क्र. ६२ /पापु-१०, दिनांक : ३० सप्टेंबर, २०१५ चे सहपत्र</td></tr>
<tr><td colspan="4">अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांसाठी कव्हरेज व गुणवत्ताबाधित/देखभाल व दुरुस्ती /शाश्वतता या घटकासाठी निधी वितरण (केंद्र हिस्सा) (लेखाशिर्ष २२१५ ९८४४)</td></tr>
<tr><td>अ. क्र.</td><td>अंमलबजावणी यंत्रणेचे नांव</td><td>घटक / बाब</td><td>वितरीत करण्यात येणारी रक्कम (रु. कोटीत)</td></tr>
<tr><td>१</td><td>महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई</td><td>कव्हरेज व गुणवत्ताबाधित</td><td>३०.६२६१</td></tr>
<tr><td>२</td><td>महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई</td><td>देखभाल व दुरुस्ती</td><td>६.१२५२</td></tr>
<tr><td>३</td><td>भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे</td><td>शाश्वतता</td><td>४.०८३४</td></tr>
<tr><td></td><td>एकूण</td><td colspan="2">रु. ४०.८३४७ कोटी (रुपये चाळीस कोटी, त्र्याऐंशी लक्ष व सत्तेचाळीस हजार मात्र)</td></tr>
</table>

Ashok Dattatray Salve

Digitally signed by Ashok Dattatray Salve
DN: CN = Ashok Dattatray Salve, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.09.30 12:13:50 +05'30'

(अ.द.साळवे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन